**महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून (MahaIT) राज्यातील अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील शिक्षक- शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची निवृत्तीवेतन प्रकरणे मा. महालेखापाल यांना ऑनलाईन पध्दतीने सादर करावयाच्या प्रणालीसाठी तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन घेणे व सुरक्षा परीरक्षणासाठीच्या (Security Audit) खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.सेवार्थ-२३२३/प्र.क्र.२२१/७६६७३१/मशि-२**
मादाम कामा मार्ग, हतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२५

**वाचा:**

१. वित्त विभागाचे पत्र क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र.२७/कोषा प्रशा-४ दि. ३.११.२०१८
२. मा. महालेखापाल यांचे अर्ध शासकीय पत्र क्र. PM/ High & Tech./Online submission/GIST ३७३०६/८०००६०४३ दि. १९.१२.२०२३
३. महाआयटी यांचे पत्र क्र. MH-IT/OW/०१२४/०००३७, दिनांक २.१.२०२४
४. संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे पत्र क्र. अमवि /२०२३/एचटीई सेवार्थ / पेशंन/ जवि/ मवि-२ / ५५८ दि. २५.१.२०२४
५. शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. सेवार्थ २२२४/ई.ऑ.नं. ७६६३०९/मशि-२ दि. १२.६.२०२४

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या निर्देशानुसार एचटीई सेवार्थ प्रणालीचे विकसन आणि देखभाल करण्याची जबाबदारी महाआयटी यांचेकडे सोपविण्यात आलेली आहे. एचटीई सेवार्थ प्रणाली ही उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारीत येणाऱ्या अनुदानीत महाविद्यालयातील तसेच अकृषी विद्यापीठातील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणाली आहे. या प्रणालीच्या विकसन आणि देखभालीचे काम उपरोक्त संदर्भाधीन क्र.५ येथील आदेशान्वये महाआयटी यांचेकडे दि. १.४.२०२४ ते दि. ३१.३.२०२५ या कालासाठी सोपविण्यात आलेले आहे. सदर एचटीई सेवार्थ प्रणालीतील त्रुटींचे निराकरण करुन नविन आवृत्ती (Version) कार्यान्वित करुन याप्रणालीमध्ये या विभागाच्या अधिनस्त राज्यातील अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे निवृत्तीवेतन प्रकरणे मा. महालेखापाल यांना ऑनलाईन पध्दतीने सादर करण्यासाठी प्रणाली / पोर्टल विकसीत करण्याचे काम महाआयटी यांना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एचटीई सेवार्थ प्रणालीची नविन आवृत्ती (Version) कार्यान्वित करण्यास तसेच या विभागाच्या अधिनस्त राज्यातील अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे निवृत्तीवेतन प्रकरणे मा. महालेखापाल यांना ऑनलाईन पध्दतीने सादर करण्यासाठी प्रणाली / पोर्टल विकसीत करण्यासाठी एक प्रोजेक्ट लीड (Project Lead) व एक सॉफ्टवेअर टेस्टर (Software Tester) असे तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्यास व प्रणालीच्या सुरक्षा परीरक्षणास तसेच सदर बाबीवर उद्भवणारा खर्च रु. ३४.४० लक्ष एवढया खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर आदेश हे दि. १.३.२०२५ ते २८.२.२०२६ या कालावधीसाठी लागू असतील.

३. सदर बाबीवर होणारा खर्च सन २०२४-२५ मध्ये "मागणी क्र.डब्ल्यु-**६,** २२५१-सचिवालयीन-सामाजिक सेवा ९०-सचिवालय ०८-उच्च व तंत्रशिक्षण विभाग (०८) (०२) उच्च शिक्षणासाठी ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम) (२२५१ १०११) १७-संगणक खर्च" या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१७१२०५४३१२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

HEMANT S PATHAK

Digitally signed by HEMANT S PATHAK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=1a58924bb1ebc2ed6699e048bfa42ad41d1ed32de1e3eda84d0c03040473905e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EE03447853A43CF2A3547CBC186E49802A70EF183CF488073E81785E6AD171A6, cn=HEMANT S PATHAK
Date: 2025.02.17 12:07:42 +05'30'

**( हे.सु.पाठक )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. अप्पर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४. मा. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मा. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. संचालक, उच्च शिक्षण, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

७. संचालक, तंत्र शिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
८. संचालक, कला संचालनालय, मुंबई
९. संचालक, ग्रंथालय संचालनालय, मुंबई
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, मंत्रालय, मुंबई
११. सर्व सहसचिव/उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण, विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सर्व विभागीय सह संचालक / क्षेत्रीय अधिकारी, उच्च / तंत्र / कला शिक्षण संचालनालय
१३. कक्ष अधिकारी (रोखशाखा), आहरण व संवितरण अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
१५. महालेखापाल ½ लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६. महालेखापाल ½ लेखा व परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१९. अवर सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवडनस्ती,मशि-२